शासकीय कर्मचा-यांना घर
बांधणी अग्रीम मंजूर करताना
द्यावयाचा तपशील.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
परिपत्रक क्रमांक एचबीए १०७९/सीआर ९०३/जीईएन-५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १६ जानेवारी १९८०.

**परिपत्रक**

शासनाच्या असे निदर्शनास आणून देण्यात आले आहे की, जेव्हा घर बांधणी अग्रीम नियम, १९६२ अन्वये एखाद्या शासकीय कर्मचा-यांस अग्रीम मंजूर करण्यात येते तेव्हा अशा प्रकारे बांधण्यात आलेल्या/खरेदी केलेल्या घराची/फ्लॅटची जागा या संबंधीचा आवश्यक तो तपशील, मंजुरी आदेशामध्ये समाविष्ट करण्यात येत नाही. त्यामुळे लेखा परीक्षेचे काम अवघड होते. या गोष्टीचा विचार करुन शासन असा निदेश देत आहे की, संबंधीत नियमानुसार शासकीय कर्मचा-याला घर बांधणी अग्रीम मंजूर करणा-या अधिका-याने अग्रीम मंजूर करताना ज्या ठिकाणी अशा प्रकारचे घर/फ्लॅट बांधावयाचे/खरेदी करावयाचे प्रस्तावित केले असेल त्या गावाचे/शहराचे नाव आणि घर/फ्लॅट याचे स्थान समजण्याच्या दृष्टीने सुलभ ठरेल असा अन्य तपशील, यासहित सर्व संबंधीत तपशील त्याच्या मंजुरी आदेशामध्ये नमूद केला पाहिजे. जर अशा प्रकारचा तपशील तात्काळ सादर करणे शक्य नसेल तर मंजुरी देणारा अधिकारी न चुकता या गोष्टींची खात्री करुन घेईल की आवश्यक तो तपशील वाजवी कालावधीमध्ये लेखापरीक्षा विभागास उपलब्ध करुन देण्यात येईल.

या परिपत्रकाचा इंग्रजी अनुवाद सोबत जोडण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

व. स. वाडेकर,
शासनाचे अवर सचिव,
वित्त विभाग.

प्रति

महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई (१६० प्रती),
महालेखापाल, महाराष्ट्र २, नागपूर (६० प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (महाराष्ट्र राज्य),
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्र्यांचे व राज्य मंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,